१९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या उस्मानाबाद जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरिता शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ च्या प्रकरणी मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशान्वये वाढीव मोबदल्यांच्या न्यायालयीन प्रकरणात उच्च न्यायालयात प्रतिभूती ठेवी जमा करणेबाबत.

(८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी)

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग ( मदत व पुनर्वसन ),**

**शासन निर्णय क्रमांक : वामोनि-२०२२/प्र.क्र.२६/आव्यप्र-२,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक : ५ मे,२०२२.

**संदर्भ** - १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) क्रमांक:आव्यप्र-२०१६/प्र.क्र.३६/आव्यप्र-२, दि.२७ एप्रिल,२०१६.

२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक: न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३ जून,२०१५.

३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे आदेश जा.क्र.२०२२/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१५१, दि. ३१.१.२०२२.

**प्रस्तावना :**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या उस्मानाबाद जिल्हयातील भूकंपग्रस्त गावांचे नवीन गावठाण पुनर्वसनासाठी शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना ठरवून दिलेली जमिनीची रक्कम जिल्हा सत्र न्यायालय व मा.दिवाणी न्यायालय यांनी विविध भूसंदर्भांमध्ये वाढीव मोबदला दिलेला असल्याने विविध प्रकरणात शासनाने मा.उच्च न्यायालयात अपील्स दाखल केली आहेत. यावर मा.उच्च न्यायालयाने वेगवेगळया आदेशांद्वारे न्यायालयात ठेव स्वरुपात निधी जमा करण्याचे आदेश दिलेले आहेत. अशा प्रकरणात उस्मानाबाद जिल्ह्यातील संपादीत करण्यात आलेल्या जमिनींचा, भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ खाली सुधारीत परिगणनेनुसार,वाढीव मोबदला म्हणून रक्कम मा.न्यायालयात ठेव स्वरुपात जमा करण्यासाठी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या उस्मानाबाद जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरिता शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ च्या प्रकरणी प्रकरणी दिवाणी न्यायालयाने दिलेल्या दिलेल्या निर्णया विरूध्द मा. उच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या प्रथम अपील प्रकरणांत संबंधित भूधारकांना मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिलेल्या (Conditional Order) आदेशान्वये वाढीव मोबदला म्हणून खालील तक्त्याप्रमाणे एकूण रक्कम **रु. १६,८८,८९८/- (रुपये सोळा लक्ष अठ्याऐंशी हजार आठशे अठ्याण्णव फक्त)** इतकी रक्कम मा. उच्च न्यायालयात प्रतिभूती ठेव म्हणून जमा करण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देत आहे:--

| मुख्य लेखाशिर्ष ८६७४ या लेखाशिर्षामधून अदा करावयाचा वाढीव मोबदला | | | | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | भूधारकांचे नाव | संपादित केलेल्या गावाचे नाव | एल.ए. आर. क्र. | रक्कम |
| १ | महेबूब गुडूसाब नळगावे (मयत) यांचे वारस श्रीमती लातुमाबी पि. महेबुब नळेगावे, फातीमाबी भ्र. महेबुब शेख, हानीफाबी भ्र.मोहमद शेख, शरीफाबी भ्र. अमीर शेख, मन्नाबी भ्र.खैरात सय्यद, अशराफबी भ्र हुसेन शेख. | मौ. सास्तूर, ता. लोहारा, जि. उस्मानाबाद | ६५५/२००५ | १६,८८,८९८/- |
| **एकूण** | **( रुपये सोळा लक्ष अठ्ठयाऐंशी हजार आठशे अठ्ठयाण्णव फक्त)** | | | **१६,८८,८९८/-** |

२. याबाबतीत होणारा खर्च हा "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (संगणक संकेतांक ८६७४ ००१९)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर उल्लेखित लेखाशीर्षाखाली देण्यात आलेली मंजुरी ही अंतरीम आहे. जर वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा अंतिम निकाल शासनाच्या बाजूने लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयातून काढून त्या रकमेचा भरणा "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा" या लेखाशीर्षाखाली करावा लागेल.

४. जर वरिष्ठ न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द लागला तर सदरहू रक्कम "मागणी क्र. सी -६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०६, भुकंप, १०१, अनुग्रह सहाय्य, (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०१) भूकंपग्रस्तांसाठी सहाय्य (२२४५ २४८१) ३१, सहाय्यक अनुदाने" या लेखाशीर्षाखाली जमा दर्शवून खर्च या अंतिम लेखाशीर्षाखाली टाकावा लागेल व त्या परिस्थितीत संबंधित जिल्हाधिकारी आवश्यक रकमेच्या मंजुरीबाबतचा रीतसर प्रस्ताव शासनास सादर करतील व अर्थसंकल्पीय तरतूद करवून घेतील.

५. संबंधीत जिल्हाधिकारी यांनी वरिष्ठ न्यायालयातील अपिलाचा निकाल लागल्याबरोबर या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. कोणत्याही खातेदारास कोणत्याही प्रकरणी दुहेरी फायदा/प्रदान मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास पाठवावा.

६. **ज्या प्रकरणी मा.उच्च न्यायालयात अनामत रक्कम भरण्याचे मा.उच्च न्यायालयाचे विवक्षित आदेश नाहीत, अशा प्रकरणी "८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" या शिर्षाखाली निधी उपलब्ध करता येणार नाही, याची दक्षता घ्यावी.**

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाने शासन निर्णय क्र.न्याकभ-१०.०६/प्र.क्र.४६/अर्थसंकल्प-२,दिनांक २९.०७.२००६ अन्वये महसूल व वन विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन तसेच वित्त विभाग परिपत्रक क्रमांक:न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५ अन्वये लेखाशिर्ष "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" या लेखाशीर्षाखाली भूसंपादन अधिनियम,१८९४ मधील कलम १८ खालील वाढीव मोबदला उपलब्ध करुन देणेबाबत प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारास अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

८. दि.१५.०२.२००३ रोजी मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने प्रथम अपील क्र.११२३/२००२ मधील सिव्हील अर्ज क्र.७९६०/२००२ मध्ये सूचित केल्याप्रमाणे नियुक्त करण्यात आलेल्या उच्चस्तरीय चौकशी समितीचे धोरण/ निर्णय या प्रकरणी लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०५१५१८४२७७१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP NAMDEO KAMBLE

Digitally signed by SANDEEP NAMDEO KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99bcaf818e1f49cebd842804, pseudonym=E14A6C7BDC7544D127BE94A39CB259A8518EA959, serialNumber=BA1E056AD55B2F343783A4C13760C8EEF1236DF77EBD34A5CC6127A29F1650B1, cn=SANDEEP NAMDEO KAMBLE
Date: 2022.05.05 15:19:14 +05'30'

**(संदीप ना. कांबळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२) जिल्हाधिकारी, उस्मानाबाद.
३) भूसंपादन अधिकारी तथा उप विभागीय अधिकारी, उमरगा,जि. उस्मानाबाद.
४) कोषागार अधिकारी, उस्मानाबाद.
५) महालेखापाल १/२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी २ प्रती)
६) वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/व्यय-१/अर्थोपाय कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
७) मा.मंत्री (भु.पु.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीस्तव सादर.
८) अवरसचिव/ कार्यासन अधिकारी (ब-१/म-३/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती, आव्यप्र-२.